**अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित प्रश्नांबाबत शासनास शिफारस करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०२१/प्र.क्र.१९८/२१/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख:- ०७.१०.२०२१

**प्रस्तावना:-**

राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित प्रश्नांच्या अनुषंगाने मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१७.०८.२०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीमध्ये मा. मंत्री महोदयांनी विद्यापीठे व महाविद्यालयीन शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित प्रश्नांचा आढावा घेऊन त्यानुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी लोकप्रतिनिधी व शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी संघटनांचे प्रतिनिधी यांचा समावेश असलेली समिती गठित करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुषंगाने यासंदर्भात समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांनी दिनांक १७.०८.२०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या निर्देशानुसार खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे :-

| क्र. | समिती सदस्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | श्री. धनराज माने, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २. | श्री. विक्रम काळे, वि. प. स. | सदस्य |
| ३. | प्रा. मनिषा कायंदे, वि. प. स. | सदस्य |
| ४. | श्री. सुधीर तांबे, वि. प. स. | सदस्य |
| ५. | श्री. ना. गो. गाणार, वि. प. स. | सदस्य |
| ६. | प्रा. डॉ. अशोक मोटे (शिक्षक प्रतिनिधी) | सदस्य |
| ७. | प्रा. डॉ. अंकुश कदम (शिक्षक प्रतिनिधी) | सदस्य |
| ८. | प्रा. डॉ. सुर्यकांत जोगदंड (शिक्षक प्रतिनिधी) | सदस्य |
| ९. | प्रा. डॉ. दत्तात्रय वाबळे (शिक्षक प्रतिनिधी) | सदस्य |
| १०. | श्री. मेघराज पंडीत (शिक्षकेतर प्रतिनिधी) | सदस्य |
| १२ | डॉ. सोनाली संतोष कदम (रत्नागिरी) | सदस्य |
| १३ | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

अ) श्री. विक्रम काळे, वि. प. स. यांनी मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांना दिलेल्या दि.०९.०८.२०२१ रोजीच्या निवेदनातील मुद्यांबाबत विद्यापीठ अनुदान आयोगाचे व राज्य शासनाचे प्रचलित धोरण तसेच मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयाचे न्यायनिर्णय विचारात घेऊन आवश्यक उपाययोजना/सुधारणा सुचविणे.

आ) सदर समितीने आपला अहवाल तीन महिन्यात शासनास सादर करावा.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११००७१६१६५७६८०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHIRAJ KANTILAL ABHANG

Digitally signed by DHIRAJ KANTILAL ABHANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b12b9d4aa7eeb9ffa769b94e214788be4cabe839cedddf6d85e5013d70af3059, pseudonym=97D6B6AF16C58D84AAAF110029FACC9F0C78C36B, serialNumber=F8E3F09FD607FF641475EAA0DB52B67C291D2CF621FCAB2188FE9BAB478FF04C, cn=DHIRAJ KANTILAL ABHANG
Date: 2021.10.08 17:47:16 +05'30'

**( धीरज अभंग )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) समिती सदस्य, यांना संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. सहसचिव/उपसचिव (मशि/विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. निवड नस्ती (विशि-१)